**त्रिगुण त्रिपुरीं वेढिला । जीवत्वदुर्गी आडिला ।**
**तो आत्माशंभूने सोडविला । तुझिया स्मृती ।। ज्ञा. १७-२**

मयासुराने ब्रह्मदेवाकडून तीन अभेद्य पुरे मागून घेतली व लोखंड, रूपे आणि सोने यांची एकावर एक अशी तीन नगरे रचिली. मयासुरानंतर त्यांच्या अनुयायांनी देवादिकांना फार त्रास देण्यास सुरुवात केली; तेव्हा ते सर्व महादेवाकडे जाऊन त्यांनी असुरनिर्दालनार्थ महादेवांची प्रार्थना केली. सर्व देवांनी या युद्धात शंकराला साहाय्य केले होते. पण गणपतीची प्रारंभी आराधना केली नसल्याने देवांना यश लाभेना. ती केल्यावरच शंकरांना त्रिपुरांचा नाश करता आला.

**पहिलिया वैराग्यगरळा । धैर्यशंभु वोडवी गळा । ज्ञा. १८-७८९**

समुद्रमंथनाच्या वेळी प्रथम जग जाळणारे हलाहल विष बाहेर पडले. तेव्हा ते कोणी उचलावे याची देवांना विवंचना पडली. शंकर जगत्कल्याणासाठी पुढे झाले व त्यांनी विष प्राशन केले. म्हणून तर पुढे अमृताची प्राप्ति झाली.

**सटवीचिये रातीं । न विसंबिजे जेवीं वाती । ज्ञा. १८-८३७.**

प्रसूतीनंतर सहाव्या दिवशी सटवीची पूजा करतात. **'विघ्नेशस्य जन्मदानां जीवन्त्यपरनाम्न्याः षष्ठीदेव्याः शस्त्रगर्भाभगवत्याश्चपूजनं करिष्ये ।'** असा पूजेचा संकल्प असतो. पाटावर तांदुळ व त्यावर चार सुपाऱ्या ठेवून जीवन्ती, षष्ठी आणि शस्त्रगर्भा भगवती या तीन देवींचे आवाहन करतात. एक कोयता सोवळ्याच्या फडक्यात गुंडाळून सुपलीत ठेवतात. **'गौरीपुत्रौ यथा स्कंदः शिशुत्वे रक्षितः पुरा। तथा ममाप्ययं बालः षष्ठिके रक्ष्यतां नमः ।।'**

अशी शेवटी प्रार्थना करतात. म्हणजे स्कंद (कार्तिकेय) याचे रक्षण सटवीनेच केले अशी कथा दिसते. रात्री काळोखात येऊन सटवीने मुलाला अपाय करू नये म्हणून त्या रात्री समई सारखी तेवत ठेवतात

**तेथ अमरत्वा वोगरिलें ।**
**ते मरणाचिलागीं जालें । ज्ञा. १८-१४७८.**

समुद्रमंथनातून जेव्हा अमृत निघाले तेव्हा ते देव आणि दानव या दोघांच्या हक्काचे झाले, पण दानवांना अमृत देऊन अमर करणे हे हानिकर म्हणून विष्णूने मोहिनीचे रूप घेऊन अमृतकलश पळविला. नंतर देव व दानव यांच्या पंक्ति समोरासमोर बसवून देवांच्या पंक्तीत मात्र विष्णु मोहिनीरूपाने अमृत वाढू लागले; त्यावेळी राहू देवांच्या पंक्तीत नकळत येऊन बसला व त्याने इतरांबरोबर अमृतपान केले. अमृत त्याच्या गळ्याखाली उतरण्यापूर्वीच चंद्रसूर्यांनी त्याला दैत्य म्हणून ओळखले. तेव्हा विष्णुने त्याचा शिरच्छेद केला.

**नहुषु स्वर्गाधिपति जाहला । परी राहटी भांबावला ।**
**तो भुजंगत्व पावला । नेणसी कायी । ज्ञा. १८-१४७९.**

पुरूरव्याचा नातू नहुष राजा हा फार पराक्रमी व सद्गुणी होता, इंद्राला ब्रह्महत्येमुळे इंद्रपदाला मुकावे लागले असतांना देवऋषींनी मिळून नहुषाला इंद्र केले व त्या स्थानी तो ऐषारामात राहू लागला. तो विषयलंपट होऊन इंद्रपदाप्रमाणेच इंद्राणीची प्राप्ति व्हावी अशी इच्छा धरून त्याने इंद्राणीला उपभोगार्थ पाचारले. संकट टळावे म्हणून तिने एक अट घातली. ती म्हणजे 'नहुषाने अपूर्व वाहनातून तिच्याकडे यावे' तेव्हा नहुषाने सप्तर्षींना रथाला जोडले व त्या रथातून तो तिच्याकडे जाऊ लागला. त्याला घाई झाली असल्याने त्याने ऋषींना लाथेने 'लवकर चला !' 'चला !' (सर्प, सर्प) असा हुकूम केला. त्याचा अगस्तीला राग येऊन त्याने, 'तूं सर्पयोनीत पतन पावशील' असा शाप दिला. तेव्हा नहुष इंद्रपदावरून च्युत होऊन सर्प झाला.

**कीं गीता हे सप्तशती । मंत्र प्रतिपाद्य भगवती ।।**
**मोहमहिषा मुक्ति । आनंदली असे ।। ज्ञा. १८-१६६६.**

रंभासुरास महिषीपासून झालेला महिषासुर. याने घोर पुरश्चरण करून ब्रह्मदेवापासून, 'पुरुषव्यक्तीपासून मला मरण नसावे", असा वर मिळविला. नंतर याने देवादिकांना अत्यंत त्रास दिला. तो सर्व प्राणिमात्रांस पीडा देऊ लागला. तेव्हा आदिशक्ति, अष्टभुजा स्त्रीरूप धारण करून, त्याच्याशीं युद्धाला प्रवृत्त झाली. त्याने तिच्या रूपावर मोहित होऊन तिला वश करण्याचा प्रयत्न केला, पण अष्टभुजेने त्याचा वध केला.

**श्रीगुरुचेनि नांवें माती । डोंगरी जयापासीं होती ।**
**तेणें कोळिये त्रिजगतीं । येकवद केली ।।**
**ज्ञा. १८-१७३०.**

हिरण्यधेनुक नांवाच्या निषादपतीला एकलव्य नांवाचा फार हुशार मुलगा होता. त्याने पांडवांप्रमाणे द्रोणाचार्यापासून अस्त्रविद्या प्राप्त व्हावी म्हणून आचार्यांना विनविले; पण त्यांनी हा निषाद जातीचा म्हणून त्याला शिष्य करून घेण्याचे नाकारले. पण त्याने द्रोणाचार्यांच्या पादुका मागून घेतल्या; त्यांची मातीची मूर्ति केली व पुढे पादुका ठेवून आपणच धनुर्विद्या शिकू लागला. या विद्येत तो पांडवांपेक्षाहि जास्त तरबेज झाला. हे पाहून त्याने अर्जुनापेक्षा भारी होऊ नये म्हणून आचार्यांनी त्याच्याजवळ गुरुदक्षिणा मागितली. ती कोणती तर त्याने अंगठा तोडून द्यावा. एकलव्याने हे मान्य केले. त्या वेळेपासून कोळी-किरात हे बाणाला अंगठ्याचा स्पर्श न करता बाण मारतात.